बेरोजगारांसाठी राज्यात संगणक
प्रशिक्षण केंद्रे सुरू करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
**शासन निर्णय** क्रमांक इएसई-२०००/प्र.क्र.१४२/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय भवन, १४वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० सप्टेंबर, २०००

**शासन निर्णय** : बेरोजगारी दूर करण्याचे हेतुने व स्वयंरोजगारासाठी पोषक वातावरण निर्मिती करण्याचे दृष्टीने स्टरलाईट फाऊंडेशन,मुंबई या केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयांतर्गत राष्ट्रीय सामाजिक व आर्थिक कल्याण अभिवृध्दी समितीने मान्यता दिलेल्या धर्मादाय संस्थेमार्फत राज्यात प्रत्येक जिल्ह्यातून बेरोजगारांसाठी **''डिप्लोमा इन कॉम्प्युटर अॅप्लीकेशन''** हा सहा महिन्याचा प्रवेश शुल्क रुपये १५०/- व त्यानंतर प्रतिमास रुपये १००/- एवढे अल्प शुल्क प्रशिक्षणार्थ्याला आकारुन संगणकीय अभ्यासक्रम प्रशिक्षण सुरु करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदरहू प्रशिक्षण राबविण्याकरिता समाजकल्याण, आदीवासी विकास विभाग व महिला व बालकल्याण विभाग तसेच इतर विभागांना त्यांच्या संस्था व कार्यालयात उपरोक्त संस्थेची प्रशिक्षण केंद्रे उघडण्याची परवानगी देण्यात येत असून प्रथमतः समाजकल्याण विभाग पुरस्कृत बेरोजगार विद्यार्थ्यांकरिता हे प्रशिक्षण सुरु करण्यास व त्यानंतर ०२ ऑक्टोबर, २००० पासून आदीवासी विकास, महिला व बालकल्याण तसेच स्वयंरोजगार निर्मितीच्या योजना राबविणा-या अन्य विभागातील बेरोजगारांकरिताही हा प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. स्टरलाईट फाऊंडेशन या संस्थेपेक्षा कमी खर्चात इतर कोणतीही संस्था त्याच दर्जाचे प्रशिक्षण देत असल्यास तशा संस्थेचे प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यास मुभा देण्यात यावी.

४. संबंधित संस्थेने विहित अभ्यासक्रमास संचालक, व्यवसाय शिक्षण व मार्गदर्शन, मुंबई यांची प्रथम मान्यता मिळवावी.

५. तसेच महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्त्याखालील महिला व बालकांच्या शासकीय व अनुदान प्राप्त (राज्यगृहे, संरक्षण गृहे, आधार गृहे, निरिक्षण गृहे, बालगृहे, बालसदन, अनाथालये व निराश्रित बालकाश्रम) संस्थेतील महिला व मुलांकरिता हे प्रशिक्षण विनामुल्य देण्यात यावे.

६. स्टरलाईट फाऊंडेशन, मुंबई संस्थेच्या या कार्यक्रमासाठी आवश्यक त्या जागा संबंधित विभाग उपलब्ध करुन देईल व त्या बदल्यात जास्तीत जास्त प्रत्येकी प्रतिमास रुपये १०००/- इतके भाडे आकारील व संस्थेबरोबर तत्संबंधीचा वार्षिक भाडेकरार त्या विभागाकडून करुन घेण्यात येईल. या भाडे कराराचे संस्थेचा तेथील कार्याचा आढावा घेऊन काम समाधानकारक असल्यास नुतनीकरण करण्यात यावे.



GR 20020408140842000-2600

७.    या सर्व कार्यक्रमाच्या समन्वयाची जबाबदारी रोजगार व स्वयंरोजगार विभागाची राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( चं. भ. घाडी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. मुख्यमंत्री
मा. मंत्री, वित्त
मा. मंत्री, समाजकल्याण व महिला व बालकल्याण.
मा. मंत्री, आदीवासी विकास.
मा. मंत्री, रोजगार व स्वयंरोजगार
मा. राज्यमंत्री, रोजगार व स्वयंरोजगार
मुख्य सचिव
अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग
प्रधान सचिव, (मा.तं.व प्र.पू.) सामान्य प्रशासन विभाग
प्रधान सचिव (वित्त)
प्रधान सचिव (नियोजन)
प्रधान सचिव (उच्च व तंत्रशिक्षण वि.)
प्रधान सचिव , ग्रामविकास विभाग
प्रधान सचिव, उद्योग
प्रधान सचिव, नगरविकास
प्रधान सचिव, गृहनिर्माण व विशेष सहाय्य
सचिव, आदीवासी विकास विभाग
सचिव, शालेय शिक्षण
सचिव, कृषि
सचिव, पदुम
सचिव, पर्यटन
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
सचिव, ग्रामीण पाणीपुरवठा व स्वच्छता
सचिव, पाटबंधारे
सचिव, जलसंधारण
आयुक्त, आदीवासी विकास, नाशिक
सर्व मंत्रालयीन विभाग
संचालक, व्यवसाय मार्गदर्शन, मुंबई
संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी
निवड नस्ती/रोस्वरो-१



GR-200204081408420000-2600